**राज्यातील इतर मागास प्रवर्ग व विशेष मागास प्रवर्ग या प्रवर्गातील लाभार्थ्यांसाठी मोदी आवास घरकुल योजना राबविण्यासाठी नवीन लेखाशिर्ष उघडण्यास मंजूरी देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**इतर मागास बहुजन कल्याण विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक: मोआयो-२०२३/प्र. क्र.४३/योजना-५**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय,,मुंबई-४०००३२.
दि.१० जुलै,२०२३.

**<u>प्रस्तावना</u> -:**

सन २०२३-२४ च्या अर्थ संकल्पीय भाषणामध्ये मा. उपमुख्यमंत्री (वित्त मंत्री) महोदयांनी यांनी दि.०९ मार्च,२०२३ रोजी राज्याचा सन २०२३-२४ करीताचा अर्थसंकल्प विधानसभेत सादर करताना अर्थसंकल्पातील परिच्छेद क्र. ७४ मध्ये " इतर मागासवर्गीय लाभार्थ्यासाठी येत्या तीन वर्षात १० लाख घरे बांधण्यासाठी नवीन "मोदी आवास" घरकुल योजना सुरु करण्यात येईल. या योजनेसाठी येत्या ३ वर्षात १२ हजार कोटी रुपये उपलब्ध करुन देण्यात येतील. यापैकी ३ लाख घरे ३ हजार ६०० कोटी रुपये खर्च करुन सन २०२३-२४ या पहिल्या वर्षात पुर्ण करण्यात येतील अशी घोषणा केली आहे. सदर योजना नवीन असल्याने त्यासाठी नवीन लेखाशिर्ष उघडण्याची बाब विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u>:-**

राज्यातील इतर मागास प्रवर्ग व विशेष मागास प्रवर्ग या प्रवर्गातील लाभार्थ्यांसाठी मोदी आवास घरकुल योजना राबविण्यासाठी मागणी क्र.झेडजी-३, प्रधान शीर्ष २२२५ अंतर्गत नवीन उप शीर्ष उघडण्यास मान्यता देण्यात येत आहे.

नवीन लेखाशिर्षाचा तपशील पुढील प्रमाणे आहे:-

| शिर्षक | लेखाशिर्षाचे मराठी नाव | लेखाशीर्षाचे इंग्रजी नाव |
|---|---|---|
| मागणी क्रमांक | झेडजी-३ | ZG-३ |
| मुख्य लेखाशीर्ष | २२२५-अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती इतर मागासवर्गीय व अल्पसंख्याक यांचे कल्याण | २२२५-Welfare Of Scheduled Cast, Scheduled Tribes and Other Backward Classes and Minorities |
| उप मुख्य लेखाशीर्ष | ०३,मागासवर्गीयांचे कल्याण | ०३-Welfare of Backward Classes |

| | | |
|---|---|---|
| गौण शीर्ष | १०२, आर्थिक विकास | १०२-Economic Development |
| गट शीर्ष | (०१), विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागास वर्ग, व विशेष मागास प्रवर्ग यांचे कल्याण | (०१) Welfare of Vimukta Jati, Nomadic Tribes, Other Backward Classes, and Special Backward Classes |
| उप गट शीर्ष | (०१) (१२) इतर मागासवर्गीय लाभार्थ्यासाठी मोदी आवास घरकुल योजना | (०१) (१२) Modi Awas Housing Scheme for Other Backward Class Beneficiaries |
| अनिवार्य/कार्यक्रम | कार्यक्रम | Scheme |
| संगणक संकेतांक | २२२५ एफ७८२ | २२२५F७८२ |

२. हे आदेश महालेखापाल कार्यालय (लेखा व हकदारी) -१, महाराष्ट्र, मुंबई यांच्याशी विचारविनिमय करुन त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र.ख.वि/चा-१/विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण विभाग/युओआर-४५/२०२३-२४/४२६, दि.०५.०७.२०२३ तसेच वित्त विभागाच्या अनौ.सं.क्र.६२७/व्यय-१४, दि.२८.०६.२०२३ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०७१११४४१५१९७३४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्ययात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NARENDRA WAMAN AHER

Digitally signed by NARENDRA WAMAN AHER
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=OTHER BACKWARD AND BAHUJAN WELFARE DEPARTMENT, 2.5.4.20=93ab34830c74c1bdd18aba78607581bb0e2e31858d9e191999dca16966984dbb, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=6658A056228A0827243EBC94F7B8895CCED1C1604820C730DA4512E19C8AEF26, cn=NARENDRA WAMAN AHER
Date: 2023.07.11 14:43:49 +05'30'

**(नरेंद्र आहेर)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

माहिती व आवश्यक कार्यवाहीसाठी अग्रषित:-

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१ व २, मुंबई/नागपूर.
२. महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट्र-१ व २, मुंबई/नागपूर
३. कार्यासन व्यय-१४/अर्थसंकल्प-५, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. कार्यासन-१४१३, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
५. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), इतर मागास बहुजन कल्याण विभाग ,मंत्रालय,मुंबई.
६. निवड नस्ती.